**मुंबई सह राज्यातील महानगरपालिकांमधील रस्त्यांवरील खड्डयांच्या संदर्भात मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः बीएमसी-२०१३/प्र.क्र.८९६/नवि-२१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०४ ऑगस्ट, २०१५

**शासन परिपत्रक :**

मुंबईसह राज्यातील काही महानगरपालिकेतील रस्त्यांच्या निकृष्टतेसंदर्भात मा. उच्च न्यायालयाने suo moto जनहित याचिका क्रमांक ७१/२०१३ (८१/२०१३) दाखल केली आहे. या याचिकेवरील सुनावणी दरम्यान मा.उच्च न्यायालयाने दिनांक २०.०५.२०१५, १०.०७.२०१५, २८.०७.२०१५ व ३१.०७.२०१५ रोजी राज्यातील मुंबईसह सर्व महानगरपालिकांमध्ये रस्त्यांतील खड्डयांच्या संदर्भात आदेश पारीत केले आहेत. सदर याचिकेवरील मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशांच्या प्रती www.bombayhighcourt.nic.in या वेबसाईटवर कृपया पहाव्यात. मा. उच्च न्यायालयाच्या दिनांक २० मे, २०१५ च्या आदेशानुसार कार्यवाही करण्याबाबतच्या विस्तृत सूचना सर्व महानगरपालिकांना शासन समक्रमांक दिनांक ०९ जुलै, २०१५ च्या परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत.

०२. बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रात MMRDA, MSRDC, BPT, PWD, MIDC, MHADA इत्यादि प्राधिकरणाचे रस्ते आहेत. तसेच मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण क्षेत्रातील अन्य महानगरपालिका क्षेत्रात सुध्दा अन्य प्राधिकरणांचे रस्ते आहेत. या रस्त्यांच्या संदर्भात नागरीकांच्या तक्रारी निवारण करण्यासाठी एककेंद्रीत तक्रार केंद्र कार्यान्वित होणे आवश्यक आहे. मा .उच्च न्यायालयाने देखील या प्रकरणी मुंबईतील रस्त्यांसाठी Common Mechanism तयार करण्याबाबत आदेश दिले आहेत. मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार मुंबई शहरातील तसेच मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण क्षेत्रातील महानगरपालिका क्षेत्रातील रस्त्यांच्या बाबतीत Common Mechanism तयार करण्याच्या संदर्भात पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत:-

**अ) बृहन्मुंबई महानगरपालिकेबाबत :**

१) बृहन्मुंबई महानगरपालिकेने पावसाळयात रस्त्यावर पडणारे खड्डे तातडीने दुरुस्त करण्यासाठी संगणकीय प्रणाली www.voiceofcitizen.com विकसित केली आहे. तथापि, सदर प्रणाली पावसाळयापुरती मर्यादित न ठेवता वर्षभर कार्यान्वित ठेवण्यात यावी व सदर प्रणालीचा वापर बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील इतर प्राधिकरणांनी सुध्दा करावा.

२) बृहन्मुंबई महानगरपालिकेने यासाठी इतर सर्व प्राधिकरणांना Login Id व Password उपलब्ध करुन द्यावा.

३) बृहन्मुंबई महानगरपालिकेने www.voiceofcitizen.com या प्रणालीवर संबंधित प्राधिकरणांच्या अखत्यारीतील रस्त्यावरील खडडयांच्या अनुषंगाने प्राप्त होणा-या तक्रारी संबंधित प्राधिकरणांकडे हस्तांतरीत कराव्यात.

४) www.voiceofcitizen.com या प्रणालीद्वारे संबंधित प्राधिकरणांकडे प्राप्त होणा-या तक्रारीवर संबंधित प्राधिकरणांनी कार्यवाही करुन त्याबाबतचा Compliance www.voiceofcitizen.com याच प्रणालीवर करावा.

५) तक्रारीचे निवारण करताना संबंधित प्राधिकरणाने दुरुस्त केलेल्या रस्त्यांचे Photographs ही सदर प्रणालीवर upload करावेत.

६) तसेच www.voiceofcitizen.com या संकेतस्थळा व्यतिरिक्त नागरीक आपली तक्रार बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे उपलब्ध असलेल्या १९१६ या मदत सेवा टोल क्रमांकावर तसेच १२९२ व १२९३ या टोल फ्री क्रमांकावर नोंदवू शकतात.

७) बृहन्मुंबई महानगरपालिकेने त्यांच्याकडे असलेल्या १९१६ या मदत सेवा टोल क्रमांकावर तसेच १२९२ व १२९३ या टोल फ्री क्रमांकावर नागरीकांकडून प्राप्त झालेल्या तक्रारी संबंधित त्या त्या प्राधिकरणांकडे हस्तांतरीत करण्यात याव्यात.

८) संबंधित प्राधिकरणांनी सदर १९१६ मदत सेवा टोल क्रमांकावर तसेच १२९२ व १२९३ या टोल फ्री क्रमांकावर बृहन्मुंबई महानगरपालिकेकडून हस्तांतरीत झालेल्या तक्रारीवर तातडीने पुढील कार्यवाही करावी.

**ब) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण क्षेत्रातील महानगरपालिकांबाबत :**

१) बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे असलेल्या www.voiceofcitizen.com या संगणकीय प्रणालीवर तसेच मदतसेवा टोल क्रमांक व टोल फ्री क्रमांकावर महापालिका क्षेत्रातील अन्य प्राधिकरणांच्या रस्त्यांसंदर्भातील तक्रारी ज्याप्रमाणे स्विकारल्या जातील, त्याप्रमाणेच मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण क्षेत्रातील (एमएमआरडीए) अन्य महापालिकाक्षेत्रातील रस्त्यांच्या तक्रारी संबंधित महापालिकांकडे असलेल्या संगणकीय प्रणालीवर व टोल फ्री क्रमांकावर स्विकारण्यात याव्यात.

२) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण क्षेत्रातील महानगरपालिकांनी त्यांच्याकडील संगणकीय प्रणाली त्यांच्या क्षेत्रातील इतर प्राधिकरणांना वापरता यावी यासाठी त्यांना Login Id व Password उपलब्ध करुन द्यावेत.

३) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण क्षेत्रातील महापालिकांनी त्यांच्या क्षेत्रातील अन्य प्राधिकरणाशी संबंधित रस्त्यांबाबतच्या तक्रारी त्या त्या प्राधिकरणाकडे हस्तांतरीत कराव्यात आणि त्या त्या प्राधिकरणाने सदर तक्रारीवर पुढील कार्यवाही करुन त्याबाबतचा Compliance सदरहू प्राधिकरणांनी दुरुस्त केलेल्या रस्त्यांच्या छायाचित्रासह महापालिकांच्या संगणकीय प्रणालीवर upload करावेत.

०३. वरीलप्रमाणे नमूद केलेल्या तक्रार निवारण Mechanism ला सर्व प्राधिकरणांनी नागरीकांच्या सोयीकरीता व्यापक प्रसिध्दी द्यावी.

०४. महानगरपालिकांच्या अखत्यारीत येणा-या सर्व रस्त्यांचे potholes तसेच रस्त्यांच्या देखभाल दुरुस्तीच्या सर्व तक्रारींचे one point grievance redressal forum हे बृहन्मुंबई महानगरपालिकेसाठी www.voiceofcitizen.com व अन्य महानगरपालिकांसाठी त्यासारखे तत्सम portal असेल.

०५. बृहन्मुंबई महानगरपालिकेसह मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण क्षेत्रातील सर्व महानगरपालिका व संबंधित प्राधिकरणांनी वरील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करुन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

०६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५०८०५१५१९५९४४२५ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sakharam Kharat

Digitally signed by Sakharam Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eb1cb39de10fe09852a24a5fa63add6d5b204146d3716e740e20fb4b2a378a55, cn=Sakharam Kharat
Date: 2015.08.05 15:23:50 +05'30'

**(स.दि.खरात)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग. मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
५. आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (MMRDA), वांद्रे (पू), मुंबई.
६. सर्व महानगरपालिका आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण क्षेत्रातील मनपा.
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ (MSRDC), मुंबई
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्यागीक विकास प्राधिकरण (MIDC), मुंबई.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण क्षेत्रविकास प्राधिकरण (MHADA), मुंबई.
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, मुंबई पोर्ट ट्रस्ट, मुंबई.
११. संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
३. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
४. सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
५. निवड नस्ती (नवि-२१).